महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व
आयुष्मान भारत - प्रधानमंत्री जन आरोग्य योजना
या एकत्रित योजनेचे विस्तारीकरण करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मफुयो- २०२३/ प्र.क्र.१६०/ आरोग्य ६**
जी. टी. रुग्णालय आवार, १० मजला
मंत्रालय, मुंबई
**दिनांक: २८जुलै, २०२३**

वाचा :-

१) सा. आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. रागांयो-२०१०/प्र.क्र.२४०/आरोग्य-६, दि. ३१ मे, २०११
२) सा. आ. विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०१६/प्र.क्र.३३१/आरोग्य-६, दि. १२ ऑगस्ट, २०१६
३) सा. आ. विभाग, शासन निर्णय क्र. रागांयो-२०१६/प्र.क्र.२०३/आरोग्य-६, दि.१६ सप्टेंबर, २०१६
४) सा. आ. विभाग,शासन निर्णय क्र. रागांयो-२०१६/प्र.क्र.६४/आरोग्य -६, दि. १३ एप्रिल, २०१७
५) सा आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६,दि.२१ सप्टेंबर,२०१८
६) सा. आ. विभाग,शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८ /प्र.क्र.७४/आरोग्य-६, दि.२६ फेब्रुवारी,२०१९
७) सा. आ. विभाग,शासन निर्णय क्र. रअयो-२०१६/प्र.क्र.२६०/आरोग्य-६, दि.१४ ऑक्टोबर,२०२०
८) सा. आ. विभाग,शासन निर्णय क्र. मफुयो-२०२०/प्र.क्र.१५३/आरोग्य-६, दि.१४ डिसेंबर,२०२०
९) सा. आ. विभाग,शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.९९/आरोग्य-६, दि.२३ मार्च,२०२३
१०) मा.मंत्रिमंडळ सचिव यांचे दिनांक ०४.०७.२०२३ चे पृष्ठांकन (मंत्रिमंडळ बैठक दि. २८.०६.२०२३, विषय क्रमांक ५, कार्यवृत्त)

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाची महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना दि. २ जुलै, २०१२ पासून राज्यात राबविण्यात येत आहे, तर आयुष्मान भारत - प्रधानमंत्री जन आरोग्य योजना ही केंद्र शासनाची आरोग्य विमा योजना असून दि. २३ सप्टेंबर, २०१८ पासून राज्यात लागू करण्यात आली. दिनांक २६ फेब्रुवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेची महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेशी सांगड घालून दोन्ही योजना राज्यात एकत्रितपणे राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार सुधारीत योजनेची दि. ०१.०४.२०२० पासून राज्यात अंमलबजावणी करण्यात येत आहे. विद्यमान महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या एकत्रित योजनेत काही बदल व योजनेचे विस्तारीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**१.** १) सध्या आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेत (PMJAY) आरोग्य संरक्षण प्रति कुटुंब प्रति वर्ष रु.५ लक्ष एवढे आहे तर महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेत (MJPJAY) आरोग्य संरक्षण प्रति कुटुंब प्रति वर्ष रु. १.५ लक्ष एवढे आहे. आता महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गतही आरोग्य संरक्षण प्रति कुटुंब प्रति वर्ष रु.५ लक्ष एवढे करण्यात येत आहे.

२) सध्या मुत्रपिंड शस्त्रक्रियेसाठी महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेमध्ये उपचार खर्च मर्यादा प्रति रुग्ण रु. २.५ लक्ष एवढी आहे, ती आता रु. ४.५० लक्ष एवढी करण्यात येत आहे.

३) सध्या महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेमध्ये ९९६ व प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेमध्ये १२०९ उपचार आहेत. यापैकी मागणी नसलेले १८१ उपचार वगळण्यात येत आहेत. तर ३२८ मागणी असलेल्या नवीन उपचारांचा समावेश करण्यात येत आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेमध्ये एकूण उपचार संख्येत १४७ ने वाढ होऊन उपचार संख्या १३५६ एवढी करण्यात येत आहे व १३५६ एवढेच उपचार महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट करण्यात येत आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेतील उपचार संख्या ३६० ने वाढविण्यात येत आहे. सदर १३५६ उपचारांपैकी ११९ उपचार केवळ शासकीय रुग्णालयांसाठी राखीव राहतील. (परिशिष्टे २ ते ५ जोडली आहेत.)

४) महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या एकत्रित योजनेमध्ये अंगीकृत रुग्णालयांची संख्या १००० एवढी आहे. सदर योजना याआधीच महाराष्ट्र कर्नाटक सीमा भागात लागू करुन सीमा लगतच्या महाराष्ट्रातील ८ जिल्हयात १४० व सीमेलगतच्या कर्नाटक राज्यातील ४ जिल्ह्यात १० अतिरिक्त रुग्णालय अंगीकृत करण्याचा निर्णय झाला आहे. त्या व्यतिरिक्त २०० रुग्णालये अंगीकृत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. म्हणजे आता अंगीकृत रुग्णालयांची संख्या १३५० होईल. याशिवाय सर्व शासकीय रुग्णालये या योजेमध्ये अंगीकृत करण्यात येतील.

५) वरील (४) मध्ये नमूद रुग्णालयांव्यतिरिक्त यापुढे मागास भागात नव्याने सुरू होणारी सर्व रुग्णालये, अशा रुग्णालयांची ईच्छा असल्यास या एकत्रित योजनेमध्ये अंगीकृत करण्यात येतील.

६) आता महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना राज्यातील सर्व शिधापत्रिकाधारक कुटुंबे व अधिवास प्रमाणपत्रधारक कुटुंबांना लागू करण्यात येत आहे.

७) स्व. बाळासाहेब ठाकरे रस्ते अपघात विमा योजनेच्या दिनांक १४.१०.२०२० च्या शासन निर्णयातील तरतुदीमध्ये सुधारणा करुन रस्ते अपघातासाठीची उपचारांची संख्या ७४ वरुन १८४ अशी वाढविण्यात येत आहे. तसेच उपचाराची खर्च मर्यादा रु. ३०,०००/- ऐवजी प्रति रुग्ण प्रति अपघात रु. १ लक्ष एवढी करण्यात येत आहे आणि या योजनेचा समावेश महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेत करण्यात येत आहे. सदर लाभार्थ्यांचा समावेश गट “ड” मध्ये करण्यात येत आहे. यामध्ये लाभार्थ्यांच्या “अ” “ब” व “क” या गटांमध्ये समाविष्ट न होणारे महाराष्ट्र सीमा भागातील रस्ते अपघातात जखमी झालेले महाराष्ट्राबाहेरील/ देशाबाहेरील रुग्ण यांचा समावेश करण्यात येत आहे.

८) सदर योजना संपूर्णपणे हमी तत्वावर राबविण्यात येईल म्हणजे उपचाराचा जो खर्च होईल तो राज्य आरोग्य हमी सोसायटी थेट अंगीकृत रुग्णालयांना प्रदान करेल. संपूर्णपणे हमी तत्वावर राबवण्याची यंत्रणा कार्यान्वित होईपर्यंत सध्याच्या पद्धतीनुसार (विमा आणि हमी तत्वावर) मात्र वरील १ ते ७ येथील सुधारित तरतूदींनुसार योजना राबविण्यात येईल.

९) शासकीय रुग्णालयांना या योजनेतून मिळणारा पैसा संबंधित रुग्णालयांकडेच ठेवण्यास परवानगी देण्यात येईल. यासंबंधातील सविस्तर आदेश नंतर निर्गमित करण्यात येतील.

२. **लाभार्थी घटक :-** महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे लाभार्थी घटक पुढीलप्रमाणे असतील.

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाब</th><th>आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना</th><th colspan="2">महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना</th></tr>
<tr><td rowspan="5">१</td><td rowspan="5">लाभार्थी घटक</td><td rowspan="5">सामाजिक, आर्थिक व जातनिहाय जनगणनेत (SECC) नोंदीत समाविष्ट कुटुंबे. अंत्योदय अन्न योजनेतील कुटुंबे. तसेच याशिवाय राज्य शासनाने शिफारस केल्यानूसार केंद्र शासनाने निश्चित केलेली कुटुंबे.</td><td>गट अ</td><td>पिवळी, अन्नपूर्णा योजना आणि केशरी शिधापत्रिकाधारक कुटुंबे.</td></tr>
<tr><td>गट ब</td><td>शुभ्र शिधापत्रिकाधारक कुटुंबे (शासकीय /निमशासकीय कर्मचारी यासह) व कोणत्याही प्रकारची शिधापत्रिकाधारक नसलेली कुटुंबे यामध्ये राज्यातील शासकीय / निमशासकीय कर्मचाऱ्यांचाही समावेश होईल.</td></tr>
<tr><td>गट क</td><td>गट -अ व गट -ब मध्ये समाविष्ट न होणारे पुढील घटक<br>शासकीय /शासनमान्य आश्रमशाळेतील विद्यार्थी, शासकीय /शासनमान्य अनाथाश्रमातील मुले, शासकीय /शासनमान्य महिला आश्रमातील महिला, शासकीय /शासनमान्य वृध्दाश्रमातील जेष्ठ नागरिक , माहिती व जनसंपर्क कार्यालयाकडील निकषानुसार पत्रकार व त्यांच्यावर अवलंबून असलेले कुटुंबातील सदस्य व महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळातील नोंदणी जिवित महाराष्ट्र राज्याबाहेरील रहिवासी असलेले बांधकाम कामगार व त्यांची कुटुंबे.</td></tr>
<tr><td>गट ड</td><td>लाभार्थ्यांच्या “अ”,”ब”,”क” या गटामध्ये समाविष्ट न होणारे महाराष्ट्र सीमा भागातील रस्ते अपघातात जखमी झालेले महाराष्ट्राबाहेरील व देशाबाहेरील रुग्ण.</td></tr>
<tr><td colspan="2">टीप १: तथापि गट-ड मधील लाभार्थ्यांकरीता आरोग्य संरक्षण हे प्रति रुग्ण प्रति अपघात रु. १ लक्ष एवढे राहील.</td></tr>
<tr><td></td><td></td><td colspan="3">टीप २ - राज्यातील कुटुंबे प्रथमत: आयुष्मान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे लाभार्थी आहेत किंवा कसे, याची तपासणी केली जाईल. आयुष्मान भारत प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेत समाविष्ट न होणाऱ्या लाभार्थ्यांचा समावेश महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेत केला जाईल.</td></tr>
<tr><td>२</td><td>लाभार्थ्यांची ओळख</td><td>आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना</td><td colspan="2">महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना</td></tr>
<tr><td rowspan="3"></td><td rowspan="3"></td><td rowspan="3">वर १ येथे नमूद केलेल्या लाभार्थी घटकांमधील लाभार्थ्यांना लाभार्थी ओळख प्रणाली अंतर्गत ई-कार्डस वितरीत करुन त्याव्दारे ओळख पटविली जाईल.</td><td>गट अ</td><td>शिधापत्रिका व फोटो ओळखपत्र</td></tr>
<tr><td>गट ब</td><td>शुभ्र शिधापत्रिका किंवा शिधापत्रिका नसेल तर अधिवास दाखला/तहसीलदार दाखला व फोटो ओळखपत्र, शासकीय/निमशासकीय कर्मचाऱ्यांकडून योजनेच्या लाभाची व्दिरुक्ती टाळण्यासाठी कोणत्याही शासकीय आरोग्य योजनेचा लाभ घेतला नसल्याबाबतचे “स्व-घोषणापत्र” घेण्यात यावे.</td></tr>
<tr><td>गट क</td><td>संबंधित संस्थेने दिलेले ओळखपत्र व फोटो ओळखपत्र</td></tr>
</table>

| अ.क्र. | बाब | आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना | महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना |
|---|---|---|---|
| | | | गट ड : १) अपघातग्रस्त व्यक्तीचा रुग्णालयातील जीओ टॅगींग फोटो<br>२) रुग्णालयांना पोलीसांनी कळविलेला फोटो<br>३) आधार कार्ड, मतदार कार्ड व पॅन कार्ड यापैकी एक फोटो ओळखपत्र. |
| ४ | दावे सादर करण्याचा व प्रदानाचा कालावधी | अंगीकृत रुग्णालयाने रुग्णास सुट्टी दिल्यानंतर ११ व्या दिवसापासून राज्य आरोग्य हमी सोसायटीकडे दावे सादर करणे आवश्यक राहील. रुग्णालयांनी सादर केलेल्या दाव्यांची वैधता तपासून १५ कार्यालयीन दिवसांमध्ये राज्य आरोग्य हमी सोसायटीने दाव्यांची रक्कम संबंधित अंगीकृत रुग्णालयांना अदा करणे आवश्यक राहील. | |
| ५ | **संगणक प्रणाली व कॉल सेंटर** | एकत्रित योजनेची संगणक प्रणाली व कॉल सेंटरचे कार्यान्वयन व सनियंत्रण राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत केली जाईल. यासाठी विहीत पध्दतीने सेवा पुरवठादाराची निवड करण्यात येईल व याकरिता होणारा खर्च सोसायटीच्या प्रशासकीय अनुदानातून केला जाईल. | |
| ६ | **अंमलबजावणी सहाय्य संस्थांची निवड** | अंमलबजावणी सहाय्य संस्थांची निवड राज्य आरोग्य हमी सोसायटीकडून गुणवत्तेच्या आधारे करण्यात येईल. लाभार्थ्यांची नोंदणी, उपचारांना पूर्वमान्यता व दाव्यांची तपासणी इत्यादी कामे अंमलबजावणी सहाय्य संस्थेकडून करण्यात येईल. अंमलबजावणी सहाय्य संस्थांना देण्यात येणारे दावे तपासणीचे शुल्क सोसायटीच्या मान्यतेने प्रदान करण्यात येईल. | |
| ७ | **आरोग्य मित्र व इतर मनुष्यबळाची नियुक्ती** | दोन्ही योजनांचे राज्य व जिल्हा स्तरावर कार्यान्वयन करण्याकरिता अंमलबजावणी सहाय्य संस्थेकडून राज्याच्या प्रकल्प कार्यालयात व जिल्हा स्तरावर आवश्यक मनुष्यबळाची नियुक्ती करण्यात येईल तसेच प्रत्येक अंगीकृत रुग्णालयात किमान एका आरोग्य मित्राची नियुक्ती अंमलबजावणी सहाय्य संस्थेकडून करण्यात येईल. | |
| ८ | **योजनेची प्रसिध्दी** | राज्य शासनाच्या धोरणानुसार योजनेचा प्रचार व प्रसिध्दी माहिती व जनसंपर्क महासंचालनाकडून करण्यात येईल, तथापि याकरिता आवश्यक खर्च राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अनुदानातून भागविला जाईल. | |

**३.** महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना यामध्ये लाभार्थी वेगवेगळे आहेत. लाभार्थ्यांची द्विरुक्ती टाळण्यासाठी (एका कुटुंबाचा समावेश दोन्ही योजनांमाध्ये होणार नाही यासाठी) लाभार्थ्यांच्या यादीची राज्य आरोग्य हमी सोसायटीने वर्षातून दोनदा पडताळणी करावी.

**४. समित्या**:- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या धोरणात्मक बाबींवर निर्णय घेण्यासाठी संदर्भाधिन क्र. ९ येथील दिनांक २३ मार्च, २०२३ च्या शासन निर्णयान्वये मा. मुख्य मंत्री यांच्या अध्यक्षतेखाली नियामक परिषद गठीत करण्यास आली आहे. तथापि, दोन्ही योजनांची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी योजनेत उद्भवणाऱ्या विविध तांत्रिक व महत्त्वपूर्ण बाबींवर तातडीने निर्णय घेण्यासाठी अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली राज्य सनियंत्रण व कार्यकारी समिती तसेच राज्य स्तरावर समन्वय, अंगीकरण व शिस्तपालन समिती, अंतिम दावे निराकरण समिती, राज्य तक्रार निवारण समिती व जिल्हास्तरावर जिल्हा सनियंत्रण व तक्रार निवारण समिती अशा समित्यांचे संदर्भाधीन दि. २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयासोबतच्या **" परिशिष्ट -१"** नुसार गठन करण्यात आलेले आहे. सदर समित्या यापुढेही कार्यरत राहतील. सदर समित्या यासोबतच्या "परिशिष्ट -१" मध्ये उद्धृत करण्यात येत आहेत. राज्य सनियंत्रण व कार्यकारी समितीची बैठक तीन

महिन्यातून एकदा किंवा आवश्यकतेनुसार आयोजित करण्यात करण्यात येईल. तर एका वर्षात नियामक परिषदेच्या किमान दोन बैठका आयोजित करण्यात येतील.

५. **वित्तीय भार :-** प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (PMJAY) योजनेंतर्गत केंद्र शासनाचा हिस्सा ६० टक्के व राज्य शासनाचा हिस्सा ४० टक्के राहील. प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्य शासनाच्या हिश्यापोटी आवश्यक निधी व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी अर्थसंकल्पामध्ये आवश्यक निधी / अतिरिक्त अनुदान सर्वसाधारण (General), अनुसूचित जाती उप योजनेंतर्गत (SCP) व अनुसूचित जमाती उप योजनेंतर्गत (TSP) राज्य शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येईल.

६. **रूग्णालयांचे अंगीकरण :-** प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत अंगीकृत करण्यात येणाऱ्या रुग्णालयांची प्रत्येक तालुक्यात किमान २ रूग्णालये याप्रमाणे महसूली विभाग निहाय संख्या निश्चित करण्याचे, राज्याच्या सर्व महसुल विभागात एकसमान पध्दतीने रुग्णालयांचे जाळे तयार करणे इ. बाबत निर्णय घेण्याचे अधिकार सचिव/प्रधान सचिव/ अ.मु.स., सार्वजनिक आरोग्य विभाग यांना राहील.

७. **उपचार :-** प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या एकूण उपचारांची संख्या निश्चित करणे, उपचारांच्या संख्येत बदल करण्याचे (कमी/जास्त), वर्णनात व दरात बदल करण्याचे व काही उपचार शासकीय रुग्णालयांसाठी राखीव ठेवण्याचे अधिकार सचिव/प्रधान सचिव/अ.मु.स.,सार्वजनिक आरोग्य विभाग यांना राहतील.

८. **योजनेतील रूग्णालये:-** सदर योजनांसाठी राज्य आरोग्य हमी सोसायटी/ सचिव/ प्रधान सचिव/ अप्पर मुख्य सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग निश्चित करतील अशा निकषांनुसार खाजगी रूग्णालयांचा, विश्वस्त संस्थांच्या रूग्णालयांचा समावेश करण्यात येईल.

९. **अंमलबजावणीचे नियम :-** सदर योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक ते नियम करण्याची जबाबदारी राज्य आरोग्य हमी सोसायटीची राहील. तथापि, योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी आवश्यक ते बदल करण्याचे अधिकार नियामक परिषद व शासनास राहतील.

१०. **कर्मचारी नियुक्त्यांबाबत :-** योजनांसाठी आवश्यक असणारा अधिकारी व कर्मचारी वर्ग कंत्राटी तत्त्वावर नियुक्त करण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटीस राहतील.

११. **खर्चाचे अधिकार :-** राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या अधिकारी- कर्मचारी यांच्या वेतनावरील खर्च, कार्यालयीन खर्च आणि विमा कंपनीस अदा करावयाचा खर्च व हमी तत्वावरील दाव्यांचा खर्च अदा करण्याचे अधिकार सोसायटीस राहतील.

१२. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत माहिती व जनसंपर्क कार्यालयाकडील निकषानुसार पत्रकारांचा व त्यांच्या कुटुंबांचा आणि महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळातील नोंदणी कार्यान्वित असलेले बांधकाम कामगार या लाभार्थी घटकांचा समावेश करण्यात आला आहे. या घटकांची संख्या अनुक्रमे सामान्य प्रशासन विभाग व उद्योग उर्जा व कामगार विभागाने निश्चीत करून राज्य आरोग्य हमी सोसायटीस उपलब्ध करून देण्यात यावी व वेळोवेळी अद्ययावत माहिती राज्य आरोग्य हमी सोसायटीस पुरविण्यात यावी. सदर लाभार्थ्यांसाठी होणारा खर्च राज्य आरोग्य हमी सोसायटीस संबधित विभागाने/कार्यालयाने उपलब्ध करून देण्याची कार्यवाही करावी. तसेच योजनेमध्ये समाविष्ट अन्य घटकांशी

संबधित विभागांनी त्या घटकांची अद्ययावत आकडेवारी वेळोवेळी राज्य आरोग्य हमी सोसायटीस उपलब्ध करून देणे आवश्यक राहील.

१३. इतर तत्सम समान स्वरुपाच्या अन्य योजना संबधित विभाग/ कार्यालयाकडून राबविण्यात येत असतील तर लाभाची द्विरुक्ती टाळण्याकरिता संबधित विभागांनी त्या बंद कराव्यात तसेच संबधित विभागांनी खर्च अदा करताना द्विरुक्ती टाळण्याच्या अनुषंगाने लाभार्थ्यासंबधात तपासणी करणे आवश्यक राहील.

१४. यासाठीच्या खर्चाची रक्कम विद्यमान महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेसोठी उपलब्ध असलेल्या लेखाशिर्षांतर्गत राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल.

१५. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक २८ जून, २०२३ रोजीच्या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे

१६.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७२८१४०६३२४४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND JAYANT MHAISKAR

Digitally signed by MILIND JAYANT MHAISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=2473caf1bd0740c3ed232022f23f47e94b26499e78b90ecc6269a55b7bd8b843, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9DC747A68267C14C9BD05A4A7749ABC36E7A3D550985715397F1DB0FAF493D82, cn=MILIND JAYANT MHAISKAR
Date: 2023.07.28 16:18:02 +05'30'

**(मिलिंद म्हैसकर)**

**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई- २१
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
विभागीय आयुक्त (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी,नॅशनल हेल्थ एजन्सी,भारत सरकार, नवी दिल्ली
मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी,वरळी, मुंबई
आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान
उप महासंचालक, आधार (यु.आय.डी), टेलिफॉन एक्चेंज बिल्डींग, कफ परेड, मुंबई
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
जिल्हाधिकारी /आयुक्त, महानगरपालीका(सर्व)

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद (सर्व)
संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
संचालक, वैद्यकिय शिक्षण विभाग, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
नियंत्रक, शिधावाटप, मुंबई
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सहसंचालक/ उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
जिल्हा पुरवठा अधिकारी, (सर्व)
जिल्हा  माहिती अधिकारी (सर्व)
अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
उप सचिव, उद्योग उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
सर्व कार्यासने , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग, व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश  वसंतराव भगवान चौक, नरीमन पाईंट , मुंबई-२०
शिवसेना,  शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर मुंबई- २८
इंडीयन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय)समिती टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई
राष्ट्रवादी कॉग्रेस पक्ष, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पाईंट मुंबई- २१
बहुजन समाज पक्ष, डी-१ इन्सा हठमेंट, आझाद मैदान, मुंबई ४०० ००१
भारतीय कम्युनिस्ट पक्ष,  महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई -०४
भारतीय कम्युनिस्ट पक्ष, मार्क्सवादी,  महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब  मिल पॅलेस, वरळी, मुंबई -१३
निवड नस्ती (आरोग्य-६)

## परिशिष्ट-१

### प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेतील समित्यांची रचना व कार्ये

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>समिती</th><th>रचना व कार्यकक्षा</th></tr>
<tr><td>१</td><td>राज्य सनियंत्रण व कार्यकारी समिती</td><td>
<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदनाम</th><th>पद</th></tr>
<tr><td>१</td><td>अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग</td><td>अध्यक्ष</td></tr>
<tr><td>२</td><td>आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>३</td><td>मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>४</td><td>संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>५</td><td>संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>६</td><td>संचालक, वैद्यकीय शिक्षण व प्रमुख रुग्णालये, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>७</td><td>विमा कंपनीचे प्रकल्प व्यवस्थापक</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>८</td><td>अंमलबजावणी सहाय्य संस्थांचे प्रकल्प प्रमुख</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>९</td><td>अंमलबजावणी सहाय्य संस्थांचे मुख्य वैद्यकीय सल्लागार</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>१०</td><td>उप मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य सचिव</td></tr>
</table>
कार्ये :-<br>
१) प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेचा आढावा घेणे.<br>
२) या दोन्ही योजनांची सुलभपणे अंमलबजावणी होण्यासाठी योजनेत उद्भवणाऱ्या विविध तांत्रिक व महत्त्वपुर्ण बाबींवर निर्णय घेणे.<br>
३) दोन्ही योजनांच्या अंमलबजावणीकरिता अंमलबजावणी सहाय्य संस्था व राज्य आरोग्य हमी सोसायटीस सुचना व मार्गदर्शन करणे.<br>
४) अंमलबजावणी सहाय्य संस्थांच्या कामाचे मुल्यमापन करणे.
</td></tr>
<tr><td>२</td><td>समन्वय, अंगीकरण व शिस्तपालन समिती</td><td>
<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदनाम</th><th>पद</th></tr>
<tr><td>१</td><td>मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>अध्यक्ष</td></tr>
<tr><td>२</td><td>प्रकल्प प्रमुख तथा विभागीय व्यवस्थापक, विमा कंपनी</td><td>उपाध्यक्ष</td></tr>
<tr><td>३</td><td>उप मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>४</td><td>मुख्य वैद्यकीय सल्लागार, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>५</td><td>अंमलबजावणी सहाय्य संस्थांचे प्रकल्प प्रमुख</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>६</td><td>अमंलबजावणी सहाय्य संस्थांचे मुख्य वैद्यकीय अधिकारी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>७</td><td>विमा कंपनीने नियुक्त केलेले प्रतिनिधी / विशेषज्ञ</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>८</td><td>सहा.संचालक (आरोग्य सेवा), राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य सचिव</td></tr>
</table>
कार्ये :-<br>
१) योजनेत रुग्णालय अंगीकृत करणे/अंगीकरण रद्द करणे/तात्पुरते निलंबित करणे.<br>
२) अंगीकृत रुग्णालयांची श्रेणी अंतिम करुन त्यास मान्यता देणे.<br>
३) दाव्यांची प्रक्रिया व अदायगी याकरिता मार्गदर्शक सुचना (Adjudication guidelines) अंतिम करण्याचा अधिकार.
</td></tr>
</table>

<table>
<tr>
<td>३</td>
<td>अंतिम दावे निराकरण समिती (सेंट्रल क्लेम कमिटी)</td>
<td>
<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदनाम</th><th>पद</th></tr>
<tr><td>१</td><td>मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>अध्यक्ष</td></tr>
<tr><td>२</td><td>प्रकल्प प्रमुख तथा विभागीय व्यवस्थापक, विमा कंपनी</td><td>उपाध्यक्ष</td></tr>
<tr><td>३</td><td>मुख्य वैद्यकीय सल्लागार, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>४</td><td>अमंलबजावणी सहाय्य संस्थांचे मुख्य वैद्यकीय अधिकारी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>५</td><td>विमा कंपनीने नियुक्त केलेले तीन डॉक्टर</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>६</td><td>सहा.संचालक (आरोग्य सेवा),राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य सचिव</td></tr>
</table>
कार्ये :-<br>
अंमलबजावणी सहाय्य संस्थांच्या मुख्य वैद्यकीय अधिकाऱ्याकडून नाकारलेल्या व कपात करण्यात आलेल्या दाव्यांबाबत पुढील निर्णय घेणे.
</td>
</tr>
<tr>
<td>४</td>
<td>राज्य तक्रार निवारण समिती</td>
<td>
<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदनाम</th><th>पद</th></tr>
<tr><td>१</td><td>मुख्य कार्यकारी अधिकारी,राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>अध्यक्ष</td></tr>
<tr><td>२</td><td>संचालक, आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>३</td><td>संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>४</td><td>संचालक, वैद्यकीय शिक्षण व प्रमुख रुग्णालये, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>५</td><td>मुख्य वैद्यकीय सल्लागार, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>६</td><td>अंमलबजावणी सहाय्य संस्थांचे प्रकल्प प्रमुख</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>७</td><td>सहा.संचालक (आरोग्य सेवा), राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>८</td><td>संचालक,आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>९</td><td>उप मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य सचिव</td></tr>
</table>
कार्ये :-<br>
राज्य पातळीवर विविध माध्यमातून योजनेविषयी प्राप्त होणाऱ्या तक्रारीबाबत सबंधित बाबी तपासून उचित निर्णय घेणे व तक्रारीचे निरसन करणे.
</td>
</tr>
<tr>
<td>५</td>
<td>जिल्हा सनियंत्रण व तक्रार निवारण समिती</td>
<td>
<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदनाम</th><th>पद</th></tr>
<tr><td>१</td><td>जिल्हाधिकारी</td><td>अध्यक्ष</td></tr>
<tr><td>२</td><td>जिल्हा आरोग्य अधिकारी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>३</td><td>अंमलबजावणी सहाय्य संस्थेचे जिल्हा प्रकल्प प्रमुख</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>४</td><td>जिल्हा समन्वयक, राज्य आरोग्य हमी सोसायटी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>५</td><td>भारतीय वैद्यकीय परिषदेचे एक प्रतिनिधी (जिल्हाधिकारी यांनी नियुक्त केलेले)</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>६</td><td>सहाय्यक संचालक (वैद्यकीय), उपसंचालक, आरोग्य सेवा कार्यालय</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>७</td><td>पालकमंत्री यांनी नियुक्त केलेले एक अशासकीय प्रतिनिधी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>८</td><td>जिल्हा शल्य चिकित्सक</td><td>सदस्य सचिव</td></tr>
</table>
कार्ये : -<br>
१) योजनेच्या कामकाजाचा सर्वांगीण आढावा घेणे.<br>
२) योजनेच्या सुलभ अंमलबजावणीकरिता अंमलबजावणी सहाय्य संस्था यांना सुचना करणे.<br>
३) जिल्हा कार्यक्षेत्रातील नवीन रूग्णालय अंगीकृत करणे, कार्यरत रुग्णालयाचे तात्पुरते निलंबन किंवा अंगीकरण रद्द करणे याकरिता राज्य आरोग्य हमी सोसायटीस शिफारस करणे.<br>
४) जिल्हा स्तरावर प्राप्त तक्रारींचे निराकरण करणे.<br>
५) समितीची दर तीन महिन्यातून एकदा बैठक आयोजित करणे.
</td>
</tr>
</table>

सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै,२०२३ सोबतचे

**परिशिष्ट-२**

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत प्रधानमत्री जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट केलेल्या १३५६ उपचारांची यादी

| Sr No | Category Name | Sub Category Name | Name of the procedure |
|---|---|---|---|
| 1 | Burns | Burns | Above 60% Mixed Burns( With Surgeries) 10 days |
| 2 | Burns | Burns Post Burn Contracture Surgeries For Functional Improvement (Package And Physiotherapy) | Mild Contracture Surgeries For Functional Improvement (including splints, pressure garments And Physiotherapy) |
| 3 | Burns | Burns Post Burn Contracture Surgeries For Functional Improvement (Package And Physiotherapy) | Moderate Contracture Surgeries For Functional Improvement (including splints, pressure garments And Physiotherapy) |
| 4 | Burns | Burns Post Burn Contracture Surgeries For Functional Improvement (Package And Physiotherapy) | Severe Contracture Surgeries For Functional Improvement (including splints, pressure garments And Physiotherapy) |
| 5 | Burns | Burns | 30 - 40% Mixed Burns( With Surgeries) |
| 6 | Burns | Burns | 40- 60% Mixed Burns( With Surgeries) |
| 7 | Burns | Burns | 45 to 60% ( Conservative) 7 days |
| 8 | Burns | Burns | 10-30% Mixed Burns( With Surgeries) |
| 9 | Burns | Burns | 30 to 45% (Conservative) 7 days |
| 10 | Burns | Burns | Up To - 30% ( Conservative) -5 days<br>15 to 30% in Adults<br>5 to 30% in below 12 years patients |
| 11 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Abdominal Vascular Injuries - Aorta, Iliac Arteries, IVC, Iliac Veins without graft- Payable maximum upto |
| 12 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Aortic dissection / aneurysm | Intrathoracic Aneurysm-Aneurysm Not Requiring Bypass (With Graft) |
| 13 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Valve Repairs | Annulus Aortic Ectasia With Valved Conduits |
| 14 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Replacement | Aortic Valve Replacement (With Mechanical valve) |
| 15 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Aorto-Aorto Bypass With Graft |
| 16 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Arterial Embolectomy |
| 17 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Axillo Bifemoral Bypass With Synthetic Graft |
| 18 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Axillo Brachial Bypass Using With Synthetic Graft |
| 19 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Brachioradial Bypass With Synthetic Graft |
| 20 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CAD | CABG Off Pump Without IABP |
| 21 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CAD | CABG On Pump Without IABP |
| 22 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CAD | CABG With Aneurysmal Repair |
| 23 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Carotid Artery Bypass With Synthetic Graft |
| 24 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Carotid Body Tumour Excision |
| 25 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Carotid Embolectomy |
| 26 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coarctation Of Aorta Repair | Coarctation Of Aorta Repair With Graft |
| 27 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coarctation Of Aorta Repair | Coarctation Of Aorta Repair Without Graft |
| 28 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CAD | CABG Off Pump With IABP |
| 29 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CAD | CABG On Pump With IABP |
| 30 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Chest | Diaphragmatic Hernia |

सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै,२०२३ सोबतचे

**परिशिष्ट-२**

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत प्रधानमत्री जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट केलेल्या १३५६ उपचारांची यादी

| Sr No | Category Name | Sub Category Name | Name of the procedure |
|---|---|---|---|
| 31 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Femoro-Femoral Bypass With Graft |
| 32 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Chest | Diaphragmatic Eventeration |
| 33 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Replacement | Double Valve Replacement (With mechnical Valve) |
| 34 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Excision Of AV Malformation without graft |
| 35 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Excision Of AV Malformation Large - with graft |
| 36 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Femoro Popliteal Bypass With Graft |
| 37 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Femorodistal Bypass With Synthetic Graft |
| 38 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Femorodistal Bypass With Vein Graft |
| 39 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Ileofemoral Bypass With Graft |
| 40 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Congenital heart disease | Intracardiac Repair Of ASD |
| 41 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Intracardiac Repair Of VSD |
| 42 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Lungs | Lobectomy |
| 43 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Lungs | Lung Cyst |
| 44 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Major Vascular Injury -In Lower Limbs-Repair without graft- Payable maximum upto |
| 45 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Medium Size Arterial Aneurysms With Synthetic Graft |
| 46 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Valve Repairs | Valve Repair With Prosthetic Ring |
| 47 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Valve Repairs | Valve Repair Without Prosthetic Ring / Supramitral membrane |
| 48 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Replacement | Mitral Valve Replacement (With mechanical Valve) |
| 49 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Replacement | Mitral Valve Replacement (With biprosthatic Valve) |
| 50 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Valve Repairs | Open Pulmonary Valvotomy |
| 51 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Medium Size Arterial Aneurysms - Repair |
| 52 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Peripheral Embolectomy Without Graft |
| 53 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Ross Procedure Intracardiac Repair Of Complex Congenital Heart Diseases | Ross procedure - Intracardiac repair of complex congenital heart diseases With Special Conduits |
| 54 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Ross Procedure Intracardiac Repair Of Complex Congenital Heart Diseases | Ross procedure - Intracardiac repair of complex congenital heart diseases Without Special Conduits |
| 55 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Ruptured Sinus Of Valsalva Correction |
| 56 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Lungs | SOL Mediastinum |
| 57 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Surgery For Intracardiac Tumours |
| 58 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Cardiac Injuries | Surgery With CPB |
| 59 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Surgery With Vein Graft |
| 60 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Surgery Without Graft For Arterial Injuries, Venous Injuries |
| 61 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Systemic Pulmonary Shunts | Systemic Pulmonary Shunts With Graft without CPB |

सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै,२०२३ सोबतचे

परिशिष्ट-२

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत प्रधानमत्री जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट केलेल्या १३५६ उपचारांची यादी

| Sr No | Category Name | Sub Category Name | Name of the procedure |
|---|---|---|---|
| 62 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Thoracic Vascular Injuries - Payable maximum upto |
| 63 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Thoracotomy, Thoraco Abdominal Approach |
| 64 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Surgical Correction Of Bronchopleural Fistula | Transpleural BPF Closure/Myoplasty/Thoracoplasty |
| 65 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Replacement | Tricuspid Valve Replacement with mechanical valve |
| 66 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Vascular Injuries Repair With Prosthetic Graft |
| 67 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Vascular Injury In Upper Limbs – Axillary,Branchial,Radial And Ulnar - Repair With Vein Graft - Payable maximum upto |
| 68 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Thyomectomy |
| 69 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Pulmonary Valve Replacement - with mechanical valve |
| 70 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Pulmonary arterio venous malformation |
| 71 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Surgery for Arterial Aneurysm Renal Artery with graft / patch |
| 72 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Failed device closure for ASD and/or VSD. Emergency retrieval of device with defect closure under cardiopulmonary bypass |
| 73 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Truncus Arteriosus surgery |
| 74 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Surgery for HOCM (Hypertrophic obstructive cardiomyopathy) |
| 75 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Congenital heart disease | Total correction of tetralogy of fallots (TOF) |
| 76 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | TAPVC Correction |
| 77 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Surgery-PDA |
| 78 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Cvts Valve Repairs | Open Mitral Valvotomy |
| 79 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular | Aorto Billac - Bifemoral Bypass With Synthetic Graft |
| 80 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Neck Vascular Injury - Carotid Vessels without graft- Payable maximum upto |
| 81 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Pericardium | Percardectomy without CPB |
| 82 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Systemic Pulmonary Shunts | Systemic Pulmonary Shunts Without Graft without CPB |
| 83 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Intracardiac repair - TOF with RVPA Conduit |
| 84 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Abdominal Vascular Injuries - Aorta, Iliac Arteries, IVC, Iliac Veins with graft - Payable maximum upto |
| 85 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Replacement | Aortic Valve Replacement (With Biprothatic Valve) |
| 86 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Replacement | Double Valve Replacement (With Biprosthatic Valve) |
| 87 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Major Vascular Injury -In Lower Limbs-Repair with graft - Payable maximum upto |
| 88 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Vascular Injuries | Neck Vascular Injury - Carotid Vessels with graft - Payable maximum upto |
| 89 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS Chest | Thoracoplasty |
| 90 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Pericardium | Percardectomy with CPB |
| 91 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Systemic Pulmonary Shunts | Systemic Pulmonary Shunts With Graft with CPB |

सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै,२०२३ सोबतचे

**परिशिष्ट-२**

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत प्रधानमत्री जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट केलेल्या १३५६ उपचारांची यादी

| Sr No | Category Name | Sub Category Name | Name of the procedure |
|---|---|---|---|
| 92 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Systemic Pulmonary Shunts | Systemic Pulmonary Shunts Without Graft with CPB |
| 93 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Replacement | Tricuspid Valve Replacement with biprosthatic valve |
| 94 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Pulmonary Valve Replacement - with biprosthatic valve |
| 95 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | On pump multivessel minimal invasive coronary artery bypass grafting |
| 96 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Minimal invasive atrial/ventricular septal defect closure |
| 97 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Minimal Invasive Aortic/Mitral valve replacement with mechanical valve |
| 98 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Minimal Invasive Aortic/Mitral valve replacement with bioprosthetic valve |
| 99 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Partial Anomalous pulmonary venous connection/return |
| 100 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CVTS | Minimal invasive valve repair with ring |
| 101 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Limb Ischaemia | ICU Management of Acute Limb Ischaemia 4 days |
| 102 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Double valve replacement with tricuspid valve repair - with ring |
| 103 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Double valve replacement with tricuspid valve repair - without ring |
| 104 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Mitral valve replacement with tricuspid valve repair with ring |
| 105 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Mitral valve replacement with tricuspid valve repair without ring |
| 106 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Emergency IABP insertion |
| 107 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Carotid to brachial bypass with prosthetic graft |
| 108 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Aortic debranching surgery with prosthetic graft |
| 109 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Fontan Procedure |
| 110 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | Open aortic Valvotomy/ Supra / Subvalvular Aortic stenosis |
| 111 | Cardiac And Cardiothoracic Surgery | | TGA (Transposition of greater arteries) Arterial switch / Senning procedure / Mustard Procedure |
| 112 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Cardiac And Cardiothoracic Surgery | Glenn Shunt (without cardiopulmonary bypass) |
| 113 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Cardiac And Cardiothoracic Surgery | Thoracocentesis |
| 114 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Cardiac And Cardiothoracic Surgery | Thrombendarterectomy |
| 115 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Cardiac And Cardiothoracic Surgery | Encysted Empyema/Pleural Effusion - Tubercular |
| 116 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Cardiac And Cardiothoracic Surgery | Thromboembolectomy usually done as emergency by ETI) |
| 117 | Cardiology | Cardiology Balloon Procedures | Balloon Atrial Septostomy |
| 118 | Cardiology | Cardiology | VSD Device Closure |
| 119 | Cardiology | Cardiology | Acute MI Requiring IABP Pump - 7 Days |
| 120 | Cardiology | Cardiology | Acute MI With Cardiogenic Shock - 7 Days |
| 121 | Cardiology | Cardiology | ASD Device Closure |
| 122 | Cardiology | Coarctation Of Aorta Repair / Aortoplasty | Coarctation Of Aorta Repair With Stent |
| 123 | Cardiology | Cardiology | Complex Arrhythmias - 2 Days |
| 124 | Cardiology | Angioplasty | Coronary Ballon Angioplasty |
| 125 | Cardiology | Cardiology | Coil Closure Multiple Coils (MAPCA - Major Aortopulmonary Collaterals) |
| 126 | Cardiology | Cardiology | Coil Closure Single Coil (PDA etc) |

सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै,२०२३ सोबतचे

**परिशिष्ट-२**

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत प्रधानमत्री जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट केलेल्या १३५६ उपचारांची यादी

| Sr No | Category Name | Sub Category Name | Name of the procedure |
|---|---|---|---|
| 127 | Cardiology | Cardiology | PDA Stenting |
| 128 | Cardiology | Cardiology | Pericardial Effusion / Tamponade - 4 days |
| 129 | Cardiology | Angioplasty | Peripheral Angioplasty |
| 130 | Cardiology | Cardiology Pacemaker Implantation | Single chember Permanent Pacemaker Implantation - 5 Days |
| 131 | Cardiology | Angioplasty | PTCA Additional Stent |
| 132 | Cardiology | Cardiology | Pulmonary Embolism - 5 Days |
| 133 | Cardiology | Cardiology | Refractory Cardiac Failure - 5 Days |
| 134 | Cardiology | Angioplasty | Renal Angioplasty |
| 135 | Cardiology | Cardiology | Simple Arrhythmias - 2 Days |
| 136 | Cardiology | Cardiology Pacemaker Implantation | Temporary Pacemaker Implantation - 2 Days |
| 137 | Cardiology | Angioplasty | Vertebral Angioplasty |
| 138 | Cardiology | Cardiology | Pulmonary artery stenting |
| 139 | Cardiology | Cardiology | Pulmonary artery stenting (double) |
| 140 | Cardiology | Cardiology | Right ventricular outflow tract (RVOT) stenting |
| 141 | Cardiology | Cardiology | Percutaneous Transluminal Tricuspid Commissurotormy (PTTC) |
| 142 | Cardiology | Cardiology | Coronary - Cameral Fistula closure / Pulmonary AV fistula Closure /PDA Device Closure |
| 143 | Cardiology | Coarctation Of Aorta Repair / Aortoplasty | Baloon dilatation of Coarctation of Aorta Without Stent |
| 144 | Cardiology | Cardiology Balloon Procedures | Percutaneous Balloon Dilatation procedures in Cardiology |
| 145 | Cardiology | | Device closure of RSOV (Rupture of Sinus of Valsalva Aneurysm) |
| 146 | Cardiology | | Post MI Ventricular septal Rupture - Device closure |
| 147 | Cardiology | | Alcohol septal ablation for hypertrophic Obstructive Cardiomyopathy |
| 148 | Cardiology | Cardiology | PTSMA (Percutaneous Transluminal Septal Myocardial Ablation) |
| 149 | Cardiology / Interventional Radiology | Vascular | D V T - IVC Filter |
| 150 | Critical Care | Critical Care | Acute Bronchitis And Pneumonia With Respiratory Failure, Ventilator 8 Days Stay - Rs 6000 per day. Rs 50000 if completed LOS |
| 151 | Critical Care | Critical Care | Acute Severe Asthma With Acute Respiratory Failure 10 Days ICU Stay. Rs 45000 if complete stay of 10 days. |
| 152 | Critical Care | Critical Care | ARDS With Ventilatory Care 10 Days Stay. Rs 65000 if LOS complete. |
| 153 | Critical Care | Critical Care | ARDS Plus DIC (Blood & Blood Products) With Ventilatory Care - 14 Days |
| 154 | Critical Care | Critical Care | ARDS With Multi Organ Failure With Ventilatory Care 14 Days Stay |
| 155 | Critical Care | Critical Care | COPD Respiratory Failure (Infective Exacerbation) 11 Days Stay with ventilator support. Rs 70000 will be approved if LOS 11 days |
| 156 | Critical Care | Critical Care | OP Poisoning / Other Poisoning Requiring Ventilatory Assistance Clinical Photo - 5 days Stay |
| 157 | Critical Care | Critical Care | Septic Shock(ICU Management) With Ventilatory Assistance - 7 Days |
| 158 | Critical Care | Critical Care | OP or other Poisoning without Ventilatory Assistance Clinical Photo 7 days ICU Stay |
| 159 | Critical care | Critical care | Cavernous / Saggital Sinus Thrombosis 10 Days Stay |
| 160 | Critical care | Critical care | Snake bite with Coagulopathy without Dialysis 7 days |

सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै,२०२३ सोबतचे

**परिशिष्ट-२**

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्यमान भारत प्रधानमत्री जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट केलेल्या १३५६ उपचारांची यादी

| Sr No | Category Name | Sub Category Name | Name of the procedure |
|---|---|---|---|
| 161 | Critical care | Critical care | Snake bite with Coagulopathy with Dialysis 7 days |
| 162 | Critical care | Critical care | Acute liver failure with Coagulopathy - 5 days |
| 163 | Dermatology | Dermatology | Pemphigus / Pemphigoid Tzanck Clinical Protocol 15 Days Stay |
| 164 | Dermatology | Dermatology | Stevens- Johnson Syndrome 5 Days ICU Stay |
| 165 | Dermatology | Dermatology | Toxic Epidermal Necrolysis 7 Days ICU Stay. Rs 30000 if LOS 7 days complete |
| 166 | Dermatology | Dermatology | Psoriatic erythroderma/ Arthropathy 3 days stay |
| 167 | Dermatology | Dermatology | Urticaria and Atopic dermatitis 5days stay |
| 168 | Dermatology | Dermatology | Hidradenitis suppurativa 5 days stay |
| 169 | Dermatology | Dermatology | Leprosy and recurrent lepra reactions 10 days stay |
| 170 | Endocrinology | Other Endocrinal Disorders | Pituitary - Acromegaly (Injections/tablets to be given of 6 months) (three day indoor stay) - Cost of 6 months Medicines |
| 171 | Endocrinology | Other endocrinal disorders | Hypopitutarism (Injections/tablets to be given of 6 months duration) (three day indoor stay) |
| 172 | Endocrinology | Other Endocrinal Disorders | Endogenous Cushings Syndrome (minimum three day stay)(Injections/tablets to be given of 6 months duration) |
| 173 | Endocrinology | Other Endocrinal Disorders | Turner syndrome/ Prader willi syndrome , three Days indoor Stay (Injections/tablets to be given of 6 months duration) |
| 174 | Endocrinology | Endocrinology | Adrenal Insufficiency - (medicines should be given for 6 months duration)(3 day indoor stay) |
| 175 | Endocrinology | Endocrinology | Endogenous Hyperthyroidism with or without Graves opthalmopathy (3 day indoor stay)medicines to given for 6 months |
| 176 | Endocrinology | Endocrinology | Gonadotropin releasing hormone excess state, 3 day indoor stay(medicines to be given for 6 months duration) |
| 177 | Endocrinology | Endocrinology | Prolactin Excess (Prolactinoma) medicines to be given for 6 months duration) (3 day indoor stay) |
| 178 | Endocrinology | Endocrinology | PTH deficiency/ PTH resistance/ Vit D resistance states/Renal rickets (medicines to be given for 6 months duration)(3 day indoor stay) |
| 179 | Endocrinology | Endocrinology | Thyrotoxic crisis - Routine Ward - 1500<br>ICU (without Ventilator) - 4000<br>ICU (with Ventilator) - 6000 - 5 Days |
| 180 | Endocrinology | Endocrinology | Somatostatin expressing neuroendocrine lesions (hyperinsulinemic hypoglycemia, tumor induced osteomalacia, thymic, pancreatic, GI-NET)(medicines to be given for 6 months duration)(3 day indoor stay) |
| 181 | Endocrinology | Endocrinology | Osteoporosis medicines (denosumab/ PTH) to be given for 6 months duration)(2 day indoor stay) |
| 182 | ENT | ENT Surgery | Drainage of Peritonsillor abscess |
| 183 | ENT | Head And Neck | Hemi/Subtotal/ Total thyroidectomy for Benign Thyroid lesion |
| 184 | ENT | Head And Neck | Partial Glossectomy |
| 185 | ENT | Head And Neck | Removal Of Submandibular Salivary Gland |
| 186 | ENT | Congenital Malformations | Velo-Pharyngial Incompetence |
| 187 | ENT | ENT | Antrostomy - Bilateral |
| 188 | ENT | ENT | Rhinotomy – Lateral |
| 189 | ENT | ENT | Excision of CA cheek/ oral cavity + radial forearm flap |
| 190 | ENT | ENT Surgery | Rhinocerebral Mucormycosis 10 Days Stay |
| 191 | ENT | ENT Surgery | Fungal Sinusitis Pns 10 Days Stay |
| 192 | ENT | ENT Surgery | Myringoplasty |

